**नोंदणी व मुद्रांक विभागाच्या अधिनस्त विविध कार्यालयाच्या जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदल्यात नवीन वाहन खरेदी करण्यास मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आस्थाप-२०२४/४०/प्र.क्र.३६/म-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक : १२ जुलै, २०२४.

**संदर्भ:-**

१) महसूल व वन विभाग, शासन ज्ञापन क्र.आस्थापना-२०११/प्र.क्र.३९५/म-१, दि.२७/०८/२०१२.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. वाहन-२०१७/२८५/प्र.क्र.७९/म-१, दि.१९/१०/२०२३.
३) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. वाहन-२०२४/प्र.क्र.११/विनियम, दि.०२/०२/२०२४.
४) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : लेखा/का. क्र.०७/वाहन आढावा/३८/२०२४, दिनांक ०८/०१/२०२४.

**प्रस्तावना :-**

नोंदणी व मुद्रांक विभागाच्या अधिनस्त विविध कार्यालयाकरीता शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भाधीन दि. १९/१०/२०२३ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्र.०४ अन्वये नोंदणी व मुद्रांक विभागाच्या यांच्या जुन्या निर्लेखित केलेल्या वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजुरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांच्या अधिनस्त कार्यालयाकरीता या शासन निर्णयासोबतच्या, **"सहपत्र-अ"** मध्ये नमूद केल्याप्रमाणे, त्यांच्या पूर्वीच्या जुन्या १८ निर्लेखित वाहनांच्या (१६ कार + २ जीप) बदली नवीन वाहन खरेदी करण्यास प्रत्येकी रुपये ८.०० लक्ष (अक्षरी रुपये आठ लक्ष फक्त) इतका खर्च नोंदणी व मुद्रांक विभागाच्या स्वीय प्रपंजी लेखा ( PLA ) मधून करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१. निधी उपलब्धतेनुसार शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक:वाहन-२०२४/प्र.क्र.११/ विनियम, दिनांक ०२/०२/२०२४ च्या शासन निर्णयामधील तरतुदीच्या अनुषंगाने नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे विभागाच्या अधिनस्त कार्यालयाच्या वाहनाकरीता प्रत्येकी रुपये ८.०० लक्ष इतकी मर्यादा (वाहनांची किंमत + टेम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादीचा खर्च अंर्तभूत करुन) वाहन खरेदी करण्यात यावी.

२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-१/ उद्योग-४, दिनांक ०१/१२/२०१६ व क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४/०८/२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करून करण्यात यावी.

३. या शासन निर्णयासोबतच्या **"सहपत्र-अ"** मध्ये नमूद निलेखित शासकीय वाहनांच्या बदली यापूर्वी नवीन वाहन खरेदी करण्यात आले नाही, या धारणेच्या अधिन राहून तसेच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन नवीन वाहन खरेदीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर खरेदी करताना त्या संबंधीच्या नेहमीच्या कार्यपध्दतीविषयी नियमांचे आणि इतर सर्व निदेशांचे काटेकोर पालन करण्याची जबाबदारी तसेच त्यामध्ये कोणत्याही प्रकारची अनियमितता आढळल्यास त्याची जबाबदारी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांची राहील.

५. नवीन वाहन खरेदीनंतर सदर वाहनाची नोंद महावाहन प्रणालीवर करण्यात यावी.

६. सदर वाहनासाठी येणारा खर्च हा सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील स्वीय प्रपंजी लेख्यामधून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२२८/२०२४/व्यय-१०, दिनांक १७/०६/२०२४ व अनौपचारीक संदर्भ क्र.२३४/२०२४/विनियम, दि.१९/०६/२०२४ अन्वये त्या विभागाने दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७१२१७१६२६५३१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1085617af371f507cb8ee4d914eb645d92480247b61bd58b5c3074ba3a6a62d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2024.07.12 17:29:49 +05'30'

**( सत्यनारायण एस. बजाज )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. अ.मु.स. (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-३२
२. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१०/विनियम), मंत्रालय, मुंबई-३२.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. निवड नस्ती (कार्यासन म-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय क्र.आस्थाप-२०२४/४०/प्र.क्र.३६/म-१ सोबतचे सहपत्र-अ**
**नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त कार्यालयाकीरता वापरातील निर्लेखित वाहनांचे विवरणपत्र.**

| अ.क्र. | वाहन वापरणा-या अधिका-यांचे पदनाम | निर्लेखित वाहन क्रमांक | वाहनाचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | सहाय्यक संचालक नगररचना (मुल्यांकन) नागपूर | MH-१२-AH-८२१६ | कार |
| २ | सहाय्यक संचालक नगररचना (मल्यांकन) अमरावती | MH-०१-Y-२८८४ | कार |
| ३ | प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई | MH-०१-YA-२८८५ | कार |
| ४ | प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई | MH-१२-AH-७६५१ | कार |
| ५ | नोंदणी उपमहानिरीक्षक, मुंबई विभाग | MH-१२-AH-८०८० | कार |
| ६ | सह जिल्हा निबंधक वर्ग-१, रायगड-अलिबाग | MH-१२-AH-७८७८ | कार |
| ७ | सह जिल्हा निबंधक वर्ग-१, रत्नागिरी | MH-०८-AF-०३५७ | जीप |
| ८ | सह जिल्हा निबंधक वर्ग-१, पुणे शहर | MH-१२-७२८४ | कार |
| ९ | सह जिल्हा निबंधक वर्ग-१, पुणे ग्रामिण | MH-१२-AH-७६४७ | कार |
| १० | सह जिल्हा निबंधक वर्ग-१, सांगली | MH-१२-AH-९२२२ | जीप |
| ११ | सह जिल्हा निबंधक वर्ग-१, कोल्हापूर | MH-०९-AG-१४६ | कार |
| १२ | सह जिल्हा निबंधक वर्ग-१, जळगांव | MH-१९-AM-३२५ | कार |
| १३ | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, छत्रपती संभाजी नगर | MH-१२-AH-७६४८ | कार |
| १४ | सह जिल्हा निबंधक, वर्ग-१, छत्रपती संभाजी नगर | MH-१२-AH-७६४९ | कार |
| १५ | नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, लातूर विभाग | MH-१२-AH-७६५० | कार |
| १६ | सह जिल्हा निबंधक वर्ग-१, लातूर | MH-१२-AH-७७७८ | कार |
| १७ | सह जिल्हा निबंधक, वर्ग-१ अमरावती. | MH-२७-AA-१४ | कार |
| १८ | सह जिल्हा निबंधक, वर्ग-१, अकोला | MH-१२-AH-७३७१ | कार |
| **एकूण** | | १८ | |